# महाराष्ट्र शासन

ई-मेल- pratapsingh.kharat@gov.in

क्रमांक: प्रामठा-२०१७ /प्र.क्र. ३३१ (भाग-१)/आ३-अ
१० मजला, गो.ते.रुग्णालय संकूल इमारत,
मंत्रालय,मुंबई-४००००१.
दिनांक :- २७ डिसेंबर,२०१९

प्रति,

आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,
राष्ट्रीय आरोग्य अभियान, आरोग्य सेवा संचालनालय,
मुंबई.

विषय :- प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे येथील महिला वॉर्ड क्र मांक ८, ९, १० चे स्थलांतर अन्य जागी करुन बांधकाम करण्याबाबतचा व मनोरुगणालयाच्या नवीन इमारतीच्या बृहत आराखडयास मान्यता देण्याबाबत.

संदर्भ :-
१) मुख्य कार्यकारी अधिकारी, ठाणे स्मार्ट सिटी लि. यांचे दि. ९/९/२०१९ रोजीचे पत्र व त्या सोबतचा बृहत आराखडा
२) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्रमांक :- संआसे/मा.आ/टे२/ ठाणे रेल्वे/जागा/२१२१/१९ दिनांक ५/११/२०१९
३) सार्वजनिक आरोग्य विभाग पत्र क्रमांक :- प्रामठा-२०१७/प्र.क्र. ३३१ (भाग-१)/आरोग्य-३अ, दिनांक २६.११.२०१९

प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे या रुग्णालयाची जागा ठाणे रेल्वे स्टेशनच्या विकासाकरीता ठाणे महानगरपालिकेस उपलब्ध करुन देण्याबाबतच्या प्रस्तावाची तपासणी करण्यासाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. २९/८/२०१८ च्या शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीच्या शिफारसी मध्ये "प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे येथील इमारती सुमारे १०० वर्षाच्या जून्या झाल्या असल्याने सार्वजनिक आरोग्य विभागाने केंद्र शासनाच्या बंगलूरु येथील NIMHANS चे राज्यातील केंद्र म्हणून प्रादेशिक मनोरुग्णालय विकसीत करण्यासाठी NIMHANS च्या धर्तीवर नवीन सुसज्ज इमारत व सर्व आवश्यक सोयीसुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे या रुग्णालयाची नवीन इमारत बांधण्यासाठी मास्टर प्लॅन तयार करावा." असे नमूद केले आहे.

२. प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे येथील सर्व इमारती ह्या १०० वर्षा पुर्वीच्या असून जीर्ण व मोडकळीस आलेल्या आहेत. प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे येथील महिला वॉर्ड क्र. ८, ९ व १० चे स्थलांतर करुन त्याचे बांधकाम रुग्णालयाच्या बृहत आराखडयात समाविष्ट करुन मनोरुग्णालयाच्या नवीन इमारतीसाठीचा बृहत आराखडा ठाणे महानगरपालिकेने सादर केला होता. सदर बृहत आराखडयाबाबत आरोग्य सेवा संचालनालयाने दिनांक ५.११.२०१९ च्या पत्रा सोबतच्या पत्रा मध्ये सुधारणा सुचविलेल्या आहेत. सदर पत्रा मध्ये सुचविलेल्या सुधारणांच्या अधीन राहून बृहत आराखडयास मान्यता देण्यात येत आहे. मनोरुग्णालयाच्या प्रस्तावित नवीन इमारतीसाठी निधी उपलब्ध झाल्यानंतर बृहत आराखडयानुसार इमारतीचे अंदाजपत्रक व नकाशे तयार करण्याचे काम हाती घेण्यात यावे.

३. सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९१२२६१६४९३७०७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2019.12.30 15:15:29 +05'30'

**(प्र. मो. बलकवडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र राज्य

प्रत,

१. मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव व विधी परामर्शी, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे
८. आयुक्त, आरोग्य सेवा, आरोग्य भवन, मुंबई

९. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य भवन, मुंबई
१०.अतिरिक्त संचालक, (आरोग्य संस्थामार्फत राबविण्यात येणार कार्यक्रम), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
११.उप संचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे
१२.सह सचिव, रुग्णसेवा यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.निवडनस्ती, कार्यासन (आरोग्य ३अ)